**मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी अवमान याचिका क्र. ४९२/२०२३ मध्ये व मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांनी विशेष अनुमती याचिका क्र. ४५६९५/२०२३ मध्ये दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने काष्टमंडूप डेव्हलपर्स प्रा.लि. यांना मुद्रांक शुल्क परतावा रकमेवरील व्याज रक्कम अदा करण्यास मंजूरी देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. याचिका- २०२३/प्र.क्र.४२६/म-१(धोरण)**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ जून,२०२४.

**वाचा** : १) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे आदेश क्र.का.१२/मु.प./प्र.क्र.६१-१२/५०७, दिनांक ०२.०५.२०२४ तसेच आदेश क्र.का.१२/मु.प./प्र.क्र.६१-१२/५३७/२०२४, दिनांक १०/५/२०२४.
२) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे पत्र क्र.का.१२/मु.प.प्र.क्र.६१-१२/५१४/२०२४, दिनांक ०७.०५.२०२४ तसेच पत्र क्र.का.१२/मु.प.प्र.क्र.६१-१२/५३९/२०२४, दिनांक १०/५/२०२४.
३) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे रिट याचिका क्र. ७९६८/२०१७, दि.५/६/२०२३ व अवमान याचिका क्र. ४९२/२०२३ दिनांक ३.५.२०२४ रोजीचे आदेश.
४) मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली, विशेष अनुमती याचिका क्र. ४५६९५/२०२३, दिनांक ३०/४/२०२४ मधील न्यायनिर्णय.
५) शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दि. १७ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना:**

काष्टमंडूप डेव्हलपर्स प्रा.लि.यांनी डीड ऑफ असाइनमेंट या दस्तांवर दि.२७/४/२०११ रोजी चलनाव्दारे भरणा केलेली मुद्रांक शुल्काची रक्कम परत मिळावी यासाठी महाराष्ट्र मुद्रांक अधिनियम, १९५८ च्या कलम ४८ उपकलम ३ खालील तरतुदीनुसार ६ महिन्यांच्या आत मुद्रांक शुल्क परतावा अर्ज दाखल केला नसल्यामुळे मुख्य नियंत्रक महसूल प्राधिकारी, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि. ७.९.२०१२ व दिनांक १.९.२०१६ रोजीच्या आदेशान्वये मुद्रांक परताव्याची अर्जदाराची विनंती अमान्य केली होती.

तथापि, अर्जदाराने मा. न्यायालयात दाखल केलेल्या याचिकांप्रकरणी मा.उच्च न्यायालयाने व मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशास अनुसरून अर्जदारास मुद्रांक शुल्क परतावा रक्कम रु.३.२३,७५,६१५/- या रकमेवरील व्याज हे मुद्रांक परतावा अर्ज दिनांक १६.०३.२०१२ पासून दिनांक ३०.०४.२०२४ पर्यंत (१२ वर्षे, १ महिना व १५ दिवस) अखेर ६% प्रति वर्ष या दराने परिगणित करून व्याज रक्कम रु.२,३५,५३,२६०/- (अक्षरी रु. दोन कोटी पस्तीस लाख त्रेपण्ण हजार दोनशे साठ मात्र) अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

काष्टमंडूप डेव्हलपर्स प्रा. लि. विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.७९६८/२०१७ मध्ये दि.५/६/२०२३ रोजी व अवमान याचिका क्र. ४९२/२०२३ मध्ये दिनांक ३/५/२०२४ रोजी व मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांनी विशेष अनुमती याचिका क्र.४५६९५/२०२३ मध्ये दिनांक ३०/४/२०२४ रोजी दिलेल्या न्याय निर्णयाच्या अनुषंगाने मुद्रांक शुल्क परतावा रक्कम रु.३,२३,७५,६१५ या रकमेवरील व्याज हे मुद्रांक परतावा अर्ज दिनांक १६.३.२०१२ पासून दिनांक ३०/४/२०२४ पर्यंत (१२ वर्षे १ महिने १५ दिवस) अखेर ६ % प्रतिवर्ष व्याज रु.२,३५,५३,२६०/- (अक्षरी रु. दोन कोटी पस्तीस लाख त्रेपण्ण हजार दोनशे साठ मात्र) अर्जदारास अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील बाबीकरीता होणारा खर्च विभागाच्या मागणी क्र. सी-२, मुख्य लेखाशीर्ष- २०३०, नोंदणी- ०३, संचालन व प्रशासन-००१, (००)(००)(०१) नोंदणी महानिरीक्षक व जिल्हा निबंधक (अनिवार्य) २०३००१०९, कार्यालयीन खर्च- १३ या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्चाच्या अदायगीकरीता नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ / विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक-२, नियम क्रमांक -७ नुसार, प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारांनुसार तसेच वित्त विभाग/व्यय-१०, अनौपचारिक संदर्भ क्र. १९७/व्यय-१०, दिनांक १५/५/२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१४११५६४८८२१९ असा आहे. हा निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL MALHARI JADHAV

Digitally signed by SUNIL MALHARI JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=a21caf384aa15b3f0e12f6f625410d8384fc1918599ab1b89ed39b6b8df74cd2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD3ACD0AE1800C2E54A0083162CA707A773B2FEF3AE4C523B53B902E3CF10460, cn=SUNIL MALHARI JADHAV
Date: 2024.06.14 12:09:55 +05'30'

**( सुनिल जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग.**

**प्रत:**

१) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर.
२) महालेखापाल १/२ (लेखा परिक्षण ) मुंबई / नागपूर.
३) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) अपर मुद्रांक नियंत्रक, प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई.
५) नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, मुंबई यांना अवगत करण्यात येते की, सदर व्याजाची रक्कम आहरण करून संबंधितांस वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात यावी.
६) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, वांद्रे (पुर्व), मुंबई- ४०० ०५१.
७) उप संचालक (लेखा), नोंदणी महानिरीक्षक कार्यालय, पुणे.
८) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) निवड नस्ती, म-१ (धो) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.